**कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत 'वाणिज्यिक पिकांच्या (कापूस, ऊस)' वार्षिक कृती आराखडयाची सन २०१७-१८ मध्ये अंमलबजावणी करण्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : असूअ ०३१७/प्र.क्र. १३/राकृवियो कक्ष**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०६ मे, २०१७

वाचा:-

१. कृषी, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र No.2-1/2017 –NFSM दि. ०९/०३/२०१७
२. कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र. No.CoA/Extn.3/NFSM-CC/Cotton/150 /2017, दि. १८/०३/२०१७
३. कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र. No.CoA/Extn3/Scane/AAP 17-18/154 /2017, दि. २३/०३/२०१७
४. कृषी, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र No. CPS -2-9/2015 -CU-IV, दि. १३/०४/२०१७
५. कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. ०३१७/प्र. क्र. १८/ राकृवियो कक्ष, दि. १३/०४/२०१७
६. कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१७/प्र. क्र. ३१/ १७-अे, दि. १९/०४/२०१७

प्रस्तावना :-

राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान केंद्र व राज्य शासनाच्या अनुक्रमे ६०:४० प्रमाणात अर्थसहाय्याने राबविण्यात येत असून अभियानांतर्गत ऊस व कापूस या वाणिज्यीक पिकांवर आधारीत पिक पध्दतींचा समावेश केला आहे. सदर अभियांतर्गत समाविष्ट पिकांच्या उत्पादन व उत्पादकतेत वाढ करणे, शेत जमिनीची सुपीकता व उत्पादकता वाढविणे, रोजगारांची संधी निर्माण करणे व शेतक-यांच्या उत्पादनात वाढ करणे ही प्रमुख्य उद्दीष्ट आहेत.

केंद्र शासनाच्या संदर्भाकित दि.०८/०३/२०१७ रोजीच्या पत्रान्वये सन २०१७-१८ करीता या अभियानांतर्गत वाणिज्यिक पिकांकरिता राज्य शासनास मंजूर झालेल्या नियत वाटपाच्या (Allocation) मर्यादेत एकूण ₹ ६०४.३३ लाख रकमेचा वार्षिक कृती आराखडा केंद्र शासनाच्या मंजूरीस्तव सादर केला होता व त्यास केंद्र शासनाने संदर्भाकित दि. १३ एप्रिल, २०१७ रोजीच्या पत्रान्वये मंजूरी प्रदान केलेली आहे. त्यानुषंगाने राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान - वाणिज्यिक पिकांकरीता (कापूस, ऊस) वार्षिक कृती आराखडयास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे -

**शासन निर्णय :**

१. सन २०१७-१८ करिता कृषि उन्नती योजनेंतर्गत - राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान - वाणिज्यिक पिके या अभियानाच्या एकूण ₹ ६०४.३३ लाख निधीच्या वार्षिक कृती आराखडयास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर वार्षिक कृती आराखडयामधील पिकनिहाय तसेच घटक / उपघटक निहाय मंजूर आर्थिक व भौतिक लक्ष्यांकांचे विवरण सोबतच्या परिशिष्ट "अ" मध्ये नमूद केले आहे. सदर अभियानाची केंद्र व राज्याच्या ६०:४० आर्थिक सहभागाच्या प्रमाणात अंमलबजावणी करण्यात यावी, त्यानुषंगाने अभियानांतर्गत पिकनिहाय आर्थिक सहभागाचा तपशील पुढीलप्रमाणे आहे -

**(₹ लाख)**

| **अ.क्र.** | **राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान - वाणिज्यिक पिके** | **केंद्र हिस्सा** | **राज्य हिस्सा** | **एकूण** |
|---|---|---|---|---|
| १. | कापूस | १७३.६१ | ११५.७४ | **२८९.३५** |
| २. | ऊस | १८८.९९ | १२५.९९ | **३१४.९८** |
| **एकूण** | | **३६२.६०** | **२४१.७३** | **६०४.३३** |

३. केंद्र शासनाने कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत विहीत केल्याप्रमाणे अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती तसेच महिला शेतकरी लाभार्थ्यांना सदर योजनेंतर्गत लाभ देण्यात यावा.

४. केंद्रिय कृषि मंत्रालयाने राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत राज्य शासनास सन २०१७-१८ करीता संदर्भांकित दि. १३ एप्रिल, २०१७ रोजीच्या पत्रान्वये दिलेल्या प्रशासकीय मान्यतेनुसार, तसेच चालू वर्षी अभियानाकरीता मंजूर केलेल्या कृति आराखडयानुसार आणि वेळोवेळी केंद्रीय कृषि मंत्रालयाने दिलेल्या दिशानिर्देशानुसार सदर अभियानाची अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील. याबाबत संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी राज्यस्तरावरुन अभियानाचे संनियंत्रण करावे, त्याचप्रमाणे अभियानाच्या प्रभावी अंमलबजावणी व संनियंत्रणाकरीता वेळोवेळी अधिनस्त कार्यालयांना निदेशित करावे.

५. राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत विविध घटकांतर्गत लाभार्थी शेतकरी निवडतेवेळी अल्प व अत्यल्प भू-धारक शेतकऱ्यांना वा सदर शेतक-यांच्या गटांना प्राधान्य देण्यात यावे, त्याचप्रमाणे केंद्र शासनाने संदर्भांकित दि. ९/०७/२०१५ रोजीच्या पत्रान्वये अभियानांतर्गत ज्या घटकांखाली थेट लाभार्थ्यांच्या खाती अनुदान जमा करण्याचे (Direct Benefit Transfer) निदेशीत केले आहे त्या घटकांचे अनुदान थेट लाभार्थ्यांच्या खाती जमा करण्यात यावे.

६. 'उन्नत शेती - समृद्ध शेतकरी' या मोहिमेच्या संदर्भांकित दि. १३ एप्रिल, २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये तसेच, लाभार्थ्यांना थेट लाभ हस्तांतरणाबाबत (DBT) संदर्भांकित दि. १९/०४/२०१७ रोजीच्या शासन निर्णयांन्वये कृषि विभागाच्या प्रचलित योजनांतर्गत विविध घटकांची अंमलबजावणी कशाप्रकारे करावी याबाबत मार्गदर्शक सूचना विहित केलेल्या आहेत. सदर दोन्ही शासन निर्णयातील सूचनांनुसार राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत - वाणिज्यिक पिकांची अंमलबजावणी करण्यात यावी.

७. संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकाऱ्यांनी/तालुका कृषि अधिकाऱ्यांनी अभियानाकरीता लाभार्थ्यांची निवड करुन अभियानांतर्गत समाविष्ट कार्यक्रम राबविण्याच्या दृष्टीने लाभार्थ्यांची यादी तालुका स्तरावर संकलित करावी. सदर यादीमध्ये शेतकऱ्याचे नांव, गांव, सर्वे/गट क्रमांक या बाबींसह, मोबाईल/दुरध्वनी क्रमांक, बँक खाते क्रमांक, आधार क्रमांक इ. बाबीची माहिती संकलित करण्यात यावी. त्याचप्रमाणे अभियानांतर्गत निवडण्यात आलेल्या लाभार्थ्यांची यादी निधी प्राप्त झाल्यापासून १५ दिवसांमध्ये कृषि विभागाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकाऱ्यांची राहील.

८. सदर लाभार्थ्यांच्या यादीनुसार सर्व लाभार्थी शेतकऱ्यांच्या शेतावर हाती घेण्यात आलेल्या कार्यक्रामाची प्रत्यक्ष तपासणी त्या-त्या गावातील कृषि सहायकांनी करावयाची असून, त्यांनी आपला अहवाल तालुका कृषि अधिकाऱ्यांमार्फत जिल्हा अधिक्षक कृषि अधिकाऱ्यांना सादर करावयाचा आहे. त्याचप्रमाणे, कृषि सहायकांचे अहवाल प्राप्त होताच सदर कार्यक्रमांतर्गत राबविण्यात आलेल्या कामांच्या पर्यवेक्षीय तपासणीचे उचित प्रमाण संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी मार्गदर्शक सूचनेमध्ये विहित करावे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५०६१५२०५५०३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सहपत्र:** वरीलप्रमाणे

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2017.05.06 15:24:03 +05'30'

**(श्रीकांत चं. आंडगे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

२. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला.
७. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
८. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
९. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१०.महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
११.महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१३.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१४.सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१५.वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई
१६.मा. मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१७.मा. राज्य मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१८. निवड नस्ती.

## परिशिष्ट – अ

## सन २०१७-१८ करिता राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान – वाणिज्यिक पिकांच्या अंमलबजावणीचा वार्षिक कृती आराखडा

| S.N. | Interventions | Approved rate of assistance | Unit | Targets Approved by GoI | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | Phy. | Fin. (₹ Lakh) |
| | **Cotton** | | | | |
| 1 | Front Line Demonstration (FLD) on Desi and ELS cotton /ELS cotton Seed production | ₹ 8000/ha (₹ 7000 for inputs & ₹ 1000 for Contingency) | Ha | 70.00 | 5.60 |
| 2 | FLD on Intercropping | ₹ 70000/ha (₹ 6000 for inputs & ₹ 1000 for Contingency) | Ha | 1000.00 | 70.00 |
| 3 | Trials on High Density Planting System | ₹ 9000/ha (₹ 8000 for inputs & ₹ 1000 for Contingency) | Ha | 2375.00 | 213.75 |
| | **Total (Cotton)** | | | | **289.35** |
| | **Central Share** | | | | **173.61** |
| | **State Share** | | | | **115.74** |
| | **Sugarcane** | | | | |
| 1 | Demonstration on intercropping and single bud chip technology with Sugarcane | ₹ 8000 per ha (₹ 7000 for inputs & ₹ 1000 for Contingency) | Ha | 3800.00 | 304.00 |
| 2 | Production of tissue culture raised plantlets/ seedlings | ₹ 3.5 per seedling / Plantlet | No. | 2.45 | 8.58 |
| 3 | State level training | ₹ 40000/ Training | No. | 6.00 | 2.40 |
| | **Total Sugarcane** | | | | **314.98** |
| | Central Share | | | | 188.99 |
| | State Share | | | | 125.99 |
| | **Total (Cotton + Sugarcane)** | | | | **604.33** |
| | Central Share | | | | 362.598 |
| | State Share | | | | 241.732 |